शासकीय सेवकांची मुदतपूर्व सेवानिवृत्ती -

विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्याची आवश्यकता.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक - विपुस - १०८० - पंधरा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक २२ सप्टेंबर, १९८०.

संदर्भ :- (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०६९-डी, दिनांक ३० सप्टेंबर, १९६९.
(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०६९-डी, दिनांक १७ ऑक्टोबर, १९६९.
(३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७०-डी, दिनांक ९ फेब्रुवारी, १९७०.
(४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०७६-पंधरा, दिनांक २९ जानेवारी, १९७६.
(५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०७६-पंधरा, दिनांक २५ मार्च, १९७६.

## परिपत्रक

शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांनुसार विहित वयोमर्यादेनंतर शासकीय सेवेत रहाण्याची शासकीय सेवकांची पात्रापात्रता ठरविण्यासाठी निश्चित कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे तसेच, जे शासकीय सेवक सेवेत रहाण्यास अपात्र ठरविले गेले असतील त्यांना संबंधित प्राधिकाऱ्यांच्या निर्णयाविरुध्द अभिवेदन सादर करता यावे, व अशा अभिवेदनांचा रीतसर विचार व्हावा, यासाठीही निश्चित कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. मुंबई नागरी सेवा नियमांमधील (बॉम्बे सिव्हिल सर्व्हिसेस रूल्स) नियम १६१ अन्वये उद्भवणाऱ्या मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या प्रकरणात वर उल्लेखिलेल्या कार्यपध्दती बहुशः योग्य प्रकारे अवलंबिल्या जात असल्याचे दिसून येते. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की सुधारित निवृत्ति-वेतन नियमावली, १९५० (रिव्हाइज्ड पेन्शन रूल्स, १९५०) मधील नियम ८ अन्वये उद्भवणाऱ्या मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या प्रकरणात वर उल्लेखिलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब नेहमी केला जातोच असे नाही.

२. मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या सर्व प्रकरणात समान कार्यपध्दतीचे अनुपालन होणे आवश्यक आहे. म्हणून शासनाचे असे आदेश आहेत की यापुढे ज्या शासकीय सेवकाच्या प्रकरणी सुधारित निवृत्तिवेतन नियमावली १९५० मधील नियम ८ अन्वये मुदतपूर्व सेवानिवृत्तीची कार्यवाही करणे इष्ट अथवा आवश्यक असल्याचे सक्षम प्राधिकाऱ्यास आढळून येईल, ते प्रत्येक प्रकरण संबंधित विशेष पुनर्विलोकन समितीसमोर ठेवण्यात यावे. सदर समितीची त्याबाबत शिफारस विचारात घेतल्यानंतरच अशा प्रकरणी निर्णय घेण्यात यावा. तसेच यापुढे ज्या शासकीय सेवकास सुधारित निवृत्तिवेतन नियमावली, १९५० मधील नियम ८ अन्वये मुदतपूर्व सेवानिवृत्तीची नोटीस दिली असेल त्याने त्याबाबत विहित मुदतीत अभिवेदन सादर केल्यास ते संबंधित अभिवेदन समितीसमोर ठेवण्यात यावे, व त्या समितीची शिफारस विचारात घेतल्यानंतरच त्यावर निर्णय घेण्यात यावा.

३. सर्व कार्यालय प्रमुख सर्व विभाग प्रमुख व मंत्रालयाचे सर्व विभाग यांना विनंती करण्यात येते की वरील आदेशांचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी.

४. हे परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित होत आहे. त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक जीसीएस-१४७८/सीआर १२८८/एसईआर-४, दिनांक २ ऑगस्ट, १९८०.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ग. ज. देशमाने,
विशेष कार्य अधिकारी.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
*प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
इतर सर्व विभागप्रमुख,
सर्व कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग.

* पत्राने.

-----

एच-३४२(४०००-९-८०).